“सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात परदेशी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत”

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: शिवृत्ती-२०२५/प्र.क्र.१९/शिक्षण-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक:- १५ मे, २०२५

**संदर्भ :-** १. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०१८/प्र.क्र.११८/ शिक्षण, दि. ११.१०.२०१८

२.शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०२३/प्र.क्र.२८/ शिक्षण-२, दि. २६.०९.२०२४

३.शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग सान्यावि-२०२४/प्र.क्र.७७/ बांधकामे,दिनांक २५.०७.२०२४

४.संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचे दि.११.०३.२०२५, दि.२८.०३.२०२५ व दि.११.०४.२०२५ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:-**

विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील मुलामुलींना परदेशी उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत शासन निर्णय, संदर्भ क्र.१ दिनांक ११.१०.२०१८ च्या तरतूदीनुसार सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षाकरिता शासन निर्णय, संदर्भ क्र.२ दिनांक २६.०९.२०२४ अन्वये ७५ विद्यार्थ्यांची अंतिम निवड करण्यात आली आहे.

सन २०२४-२५ करिता परदेश शिष्यवृत्ती योजनेंतर्गत अंतिम निवड केलेल्या विद्यार्थ्यांपैकी नाशिक विभागातील एकूण ०४ विद्यार्थ्यांकरिता प्रचलित शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार एकूण रक्कम रु.१,२२,२१,०७२/- (अक्षरी रुपये एक कोटी बावीस लक्ष एकवीस हजार बाहत्तर फक्त) इतकी शिष्यवृत्ती रक्कम मिळणेबाबतचा प्रस्ताव संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय पुणे यांच्या संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये शासनास प्राप्त झाले आहे. यानुषंगाने सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ करिता परदेश शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत अंतिम निवड केलेल्या विद्यार्थ्यांपैकी नाशिक विभागातील एकूण ०४ विद्यार्थ्यांकरिता खालील विवरणपत्रानुसार रक्कम रु.१,२२,२१,०७२/- (अक्षरी रुपये एक कोटी बावीस लक्ष एकवीस हजार बाहत्तर फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | विद्यार्थ्याचे नाव | अभ्यासक्रम कालावधी | चलन | शिक्षण शुल्क | निर्वाह भत्ता | आरोग्य विमा | विमान प्रवास | इतर खर्च | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | कल्पेश संजय फिरके | ०२ | १ EUR= ९४.७२ १$ ८६.५२ | ९५३४.०८ रू.९,०३,०६८/- **(प्रथम वर्ष)** | US $ ११४०० रू.९,८६,३२८ /- **(प्रथम वर्ष)** | रू.१,४९,८५५/- **(प्रथम वर्ष)** | रु.४९,४८९/- | US $ १५०० रू.१,४२,०८० **(प्रथम वर्ष)** | **रु.२२,३०,८२०/-** |
| २ | शुभम देविदास चव्हाण | ०१ | १ GBP = १०६.१७ | GBP २७३४० रू.२९,०२,६८८/- **(प्रथम वर्ष)** | GBP ९९०० रू.१०,५१,०८३ **(प्रथम वर्ष)** | रू.१,३१,२३४/- **(प्रथम वर्ष)** | रु.५३,४६०/- | -- | **रु. ४१,३८,४६५/-** |
| ३ | तेजस खंडेराव जाधव | ०२ | १ USD = ८६.२७ | USD ११०१४.६ रू.९,५०,२२९/- (द्वितीय **वर्ष** प्रथम सत्र) | USD १०८६२ रू.९,३७,०६५/- **(द्वितीय वर्ष)** | USD ७७२.५५ रू.६६,६४८ /- **(द्वितीय वर्ष)** | - | - | **रु.१९,५३,९४२/-** |

| अ.क्र | विद्यार्थ्याचे नाव | अभ्यासक्रम कालावधी | चलन | शिक्षण शुल्क | निर्वाह भत्ता | आरोग्य विमा | विमान प्रवास | इतर खर्च | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ४ | ओंकार भाऊसाहेब पवार | ०१ | १ GBP = १०७.२८ | GBP २४८०० रू.२६,६०,५४४/- (प्रथम वर्ष ) | GBP ९९०० रू.१०,६२,०७२/- (प्रथम वर्ष ) | रू.१,२८,००९/- (प्रथम वर्ष ) | रू.४७,२२०/ | - | **रु.३८,९७,८४५/-** |
| (अक्षरी रुपये एक कोटी बावीस लक्ष एकवीस हजार बाहत्तर फक्त) | | | | | | | | एकूण | **रु.१,२२,२१,०७२/-** |

२. उपरोक्तप्रमाणे निधी वितरणासाठी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व लेखा अधिकारी, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

नियंत्रक अधिकारी तथा संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनासाठी खर्च करावा. निधी खर्च झाल्यावर खर्चाचे विवरण (जिल्हा निहाय/लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र न चूकता शासनास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी तथा संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

३. उपरोक्त निधी सदर विद्यार्थ्यास वितरीत करत असताना विद्यार्थ्यांनी सादर केलेल्या निधी मागणीचा प्रस्ताव तपासून, विद्यापिठाची कागदपत्र पडताळणी करुन, सदर निधी ज्या विद्यार्थ्याकरिता मंजूर करण्यात आलेला आहे त्याच विद्यार्थ्याकरिता खर्ची पडेल तसेच, परदेशी शिष्यवृत्ती अंतर्गत शासन निर्णय, संदर्भ क्र. १ दि. ११.१०.२०१८ व शासन शुद्धिपत्रक दि. २४.०१.२०२३ , दि.१६.०३.२०२३, दि.२५.०७.२०२४ व दि.२६.०९.२०२४ मधील अटी व शर्तींची पुर्तता करुन संबंधित विद्यार्थ्यांचे निधी मागणीचे प्रस्ताव तपासून निधी मंजूर करण्याबाबतची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

४. सदर निधी खर्च करतांना वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका तसेच वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकातील अटी व शर्तींचा भंग होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

५. सदर खर्च सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात "मागणी क्रमांक झेडजी-०३ (०२) (१८) विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील गुणवंत मुलामुलींना परेदशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती (कार्यक्रम) (२२२५ एफ २१८)" या लेखाशीर्षातर्गत उपलब्ध केलेल्या तरतूदीतून करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०५१५१४४४०६४९३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VAISHALI DATTATRAYA FULSUNDAR

Digitally signed by VAISHALI DATTATRAYA FULSUNDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=00e21046f4f20f3438928047553b9a3968c8ec5276af8883c74ff066482ba683, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=035AD3AC42B3CB2D7153EB07CA4987F4C28AA8B52BAD8A330512FC5DF5D5B426, cn=VAISHALI DATTATRAYA FULSUNDAR
Date: 2025.05.15 14:45:36 +05'30'

**( वै. द. फुलसुंदर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
२.महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६.प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, नाशिक.
७.मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव.
८.मा. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
९.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०.निवडनस्ती (शिक्षण-२)